पृथ्वीराज देशमुख मुलींची सैनिकी शाळा, धर्मापूरी, ता.जि.परभणी या सैनिकी शाळेस आदिवासी विदयार्थीनीची तुकडी सुरू करण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः इसैशा-२०१६/प्र.क्र.६२/एसएम-६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ३२
तारीख: ०६ फेब्रुवारी, २०२०

वाचा -

१)शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग, क्रमांक इसैशा १०९५/(२७८/९५)/माशि-८, दिनांक २६ सप्टेंबर, १९९५

२)शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग, क्रमांक इसैशा २००६/प्र.क्र.१२३/माशि-७, दिनांक २४ डिसेंबर,२००७

३)शासन पत्र, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग प.क्र. इसैशा२००९/(१०/०९)/माशि ७, दिनांक २१ ऑगस्ट, २०१३

४) शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग, क्रमांक : ईसैशा-२०१७/प्र.क्र.३६/एसएम-६, दिनांक १३ सप्टेंबर,२०१९

प्रस्तावना-

राज्यात प्रत्येक जिल्हयात माध्यमिक व उच्च माध्यमिक स्तरापर्यंत सैनिकी शिक्षण उपलब्ध करून देण्यासाठी खाजगी सक्षम व स्वयंसेवी व्यवस्थापनांमार्फत सैनिकी शाळा सुरू करण्यास शासनाने संदर्भाधीन दिनांक २६ सप्टेंबर,१९९५ च्या शासन निर्णयान्वये परवानगी दिली आहे. सदर सैनिकी शाळेमध्ये आदिवासी विदयार्थ्यांना सैनिकी शिक्षण देण्याकरीता इयत्ता ५ वी पासून ४५ विदयार्थ्यांची स्वतंत्र तुकडी सुरु करण्यास शासनाने संदर्भाधीन दिनांक २४ डिसेंबर, २००७ च्या शासन निर्णयान्वये परवानगी दिली आहे.

श्री दुर्गामाता बहुउद्देशीय क्रीडा व शैक्षणिक संस्था, चिंचोली, जि.यवतमाळ या संस्थेस पृथ्वीराज देशमुख मुलींची सैनिकी शाळा, धर्मापुरी, ता.जि.परभणी येथे मुलींची सैनिकी शाळा सुरु करण्यास संदर्भाधीन क्र. (३) येथील दिनांक २१ ऑगस्ट,२०१३ च्या शासन पत्रान्वये मान्यता दिली आहे. सदर सैनिकी शाळेत दिनांक २४ डिसेंबर,२००७ च्या शासन निर्णयानुसार ४५ आदिवासी विदयार्थीनीना सन २०१९-२० या शैक्षणिक वर्षापासून सैनिकी शिक्षण देण्याकरीता स्वतंत्र तुकडी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

श्री दुर्गामाता बहुउद्देशीय क्रीडा व शैक्षणिक संस्था, चिंचोली, जि.यवतमाळ या संस्थेस पृथ्वीराज देशमुख मुलींची सैनिकी शाळा, धर्मापुरी, ता.जि.परभणी या सैनिकी शाळेस सन २०२०-२१ या शैक्षणिक वर्षापासून इयत्ता ५ वी ची आदिवासी तुकडी सुरू करण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

अ) एक सर्वसाधारण तुकडी मंजूरीनंतर एक आदिवासी तुकडी मंजूर करताना सर्वसाधारण तुकडीमध्ये ४५ विद्यार्थीनी व आदिवासी तुकडीत किमान ३० विद्यार्थीनी किंवा आदिवासी तुकडीत ४५ व सर्वसाधारण तुकडीत किमान ३० विद्यार्थीनी असणे आवश्यक राहील असा निकष विहित राहील. सर्वसाधारण विद्यार्थीनी व आदिवासी विद्यार्थीनी यांची एकत्रित संख्या ४५ झाल्यावर पुढील प्रवेशासाठी आपोआप दुसरी तुकडी अनुज्ञेय राहणार नाही.

ब) सर्वसाधारण माध्यमिक शाळेतील व सैनिकी शाळेतील शिक्षकांची शैक्षणिक अर्हता समान असल्यास, या (अतिरिक्त) आदिवासी तुकडीसाठी आवश्यक पदे अतिरिक्त शिक्षकांमधून समायोजनाने भरण्यासंदर्भात कार्यवाही करण्यात यावी.

क) सदर पदे अतिरिक्त शिक्षकांमधून भरता येत नसल्यास या पदांसाठी विहित कार्यपध्दतीने शिक्षकांची निवड करण्यात यावी व हीच कार्यपध्दती भविष्यात अवलंबिण्यात यावी.

२. संदर्भाधीन क्र. १ व २ येथील शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आलेल्या अटी व शर्तीची तसेच पटसंख्येच्या निकषांची पूर्तता तसेच भौतिक सोयी सुविधांची उपलब्धता विचारात घेऊन सदर सैनिकी शाळेतील आदिवासी तुकडीस मान्यता देण्यात आली आहे. ही बाब संबंधित संस्थेला शिक्षणाधिकारी (माध्यमिक) यांनी सकारण कळवावी.

३. सदर शासन निर्णय आदिवासी विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ५/का.११, दिनांक २६.०४.२०१९ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३०५/२०१९/व्यय-५/वित्त विभाग, दिनांक १६.०५.२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२०६१६५५१३४६२१ हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUSHIL KHODWEKAR

Digitally signed by SUSHIL KHODWEKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=1c4a8f0aafeac0a009d462f7f02d23942001d76225b9f704de26731171c8684b, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=19b0ccbee5810aa5e36e9fa467a7630471d3c500ceb353fbb37bf0b6dfe0407a, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SUSHIL KHODWEKAR
Date: 2020.02.06 16:56:57 +05'30'

**(सुशिल खोडवेकर (भा.प्र.से.))**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिवालय,
२. मा.मंत्री (शालेय शिक्षण ) यांचे विशेष कार्यकारी अधिकारी,
३. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, मुंबई
४. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद, मुंबई
५. सर्व विधान सभा व विधान परिषद सदस्य
६. अपर मुख्य सचिव, (शालेय शिक्षण ) मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
७. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
८. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
९. विभागीय शिक्षण उपसंचालक, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
१०.शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद, परभणी
११.निवड नस्ती (एसएम-६)